# मासोळी आणि चिमुकलं पाखरू

माधुरी पुरंदरे



ज्योत्स्ना प्रकाशन

# मासोळी आणि चिमुकलं पाखरू

लेखन: माधुरी पुरंदरे
चित्रे: मेधा सुदुंबरेकर



ज्योत्स्ना प्रकाशन





प्रकाशक :
मिलिंद ल. परांजपे
ज्योत्स्ना प्रकाशन
'धवलगिरी'
४३०-३१ शनिवार पेठ
पुणे ४११०३०

मुंबई ऑफिस :
मोहन बिल्डिंग
१६२ ज. शंकरशेठ मार्ग
गिरगाव, मुंबई ४००००४



प्रथमावृत्ती : २९ मार्च २००५

मुद्रक :
युनिक ऑफसेट
आनंद शिल्प
१५२३ सदाशिव पेठ
पुणे ४११०३०

मूल्य तीस रुपये

ISBN 81-7925-122-5

ह्या पुस्तकाच्या निर्मितीसाठी
डॉ. संजीवनी कुलकर्णी व डॉ. विनय कुलकर्णी
यांचे साहाय्य लाभले आहे.
आम्ही त्यांचे मन:पूर्वक आभारी आहोत.

# थंडी पळाली

एक होती मेंढी.

तिचं नाव बबी.

बबी चांगली अबदुल गबदुल होती. तिच्या अंगावर खूप लोकर होती. इतकी की ती लोकर पायात आल्यामुळे कधी कधी तिला चालताच यायचं नाही आणि डोळ्यांवर लोंबणाऱ्या लोकरीमुळे कधी कधी दिसायचंसुद्धा नाही.



बबीच्या कानांवर तर इतकी लोकर वाढली होती की बंबू कुत्र्यानं कानाशी 'भो भो' केलं तरीही बबीला ऐकू यायचं नाही.

एवढी सगळी लोकर अंगावर घेऊन चालताना बबी अगदी थकून जायची.

एकदा बबीकडे चिऊताई आली. बबीला म्हणाली,

"बबीताई, मला किनई माझ्या पिल्लांसाठी घरटं बांधायचंय. तुझी थोडीशी मऊमऊ लोकर देशील का?"



बबी आनंदानं म्हणाली, "होऽऽ, हव्वी तेवढी घेऊन जा!"

चिऊताईनं बबीची थोडी लोकर काढून नेली. तरीसुद्धा खूप लोकर उरली.





मग काऊताई आली आणि तिनं थोडी लोकर काढून नेली. तरीसुद्धा लोकर उरली.



मग साळुंकी आली, बाया आली, शिंपीण, बुलबुल, दयाळ, कबूतर, सगळ्यांनी थोडी थोडी लोकर नेली.

उंदीरमामा म्हणाला, ''मलासुद्धा माझ्या बिळात लोकरीची गादी हवी.'' त्यानं थोडी लोकर नेली.





मग ''मला पण, मला पण,'' असं म्हणत खारुताई, चिचुंद्री आणि मुंगूससुद्धा आले अन् उरलीसुरली लोकर घेऊन गेले.



वा ! बबीला एकदम हलकं हलकं वाटायला लागलं.

ती इकडून तिकडे तुरुतुरु धावली, तिनं टण् टण् उड्या मारल्या. बबी एकदम खूष होऊन गेली.



दिवाळी संपली. सकाळी थोडं धुकं पडायला लागलं.
उन्हं मऊ मऊ झाली. आकाशाचा रंग निळाशार झाला.
सकाळी लवकर उठून गाणं म्हणत सगळ्यांना उठवणारी
पाखरं उशिरापर्यंत आपल्या घरट्यात
गुरगुटून बसायला लागली.
झाडांची पानं गळायला
लागली.

थंडी आली!!



हू हू हू ! बबी काकडली.

अंगावर लोकर असती तर थंडी वाजली नसती.

बबी चिऊताईला म्हणाली, "चिऊ गं चिऊ, मला खूप थंडी वाजतेय गं! माझी लोकर परत देतेस?"

चिऊताई म्हणाली, "तुला लोकर दिली तर माझ्या पिल्लांना थंडी वाजेल."

बबी म्हणाली,

"बरं, राहू दे."



मग बबी काऊकडे गेली.

"काऊताई, मला थंडी वाजतेय, माझी लोकर मला परत देतेस?"

ती म्हणाली, "तुला लोकर दिली तर माझ्या बाळांना थंडी नाही का वाजणार?"

बबी म्हणाली, ''बरं, असू दे.''

मग बबीनं साळुंकी, कबुतर, उंदीरमामा, खारुताई अशा सगळ्यांना विचारलं.

सगळेजण म्हणाले, ''तुला लोकर दिली तर आम्हाला थंडी वाजेल.''

बबी एवढंसं तोंड करून कुडकुडत राहिली.



एवढ्यात तिकडून एक धनगराचा छोटा मुलगा आला. त्याच्या अंगावर लोकरीची उबदार घोंगडी होती.



मुलगा म्हणाला, ''का गं अशी कुडकुडतेस बबे?''

बबी म्हणाली, ''काय करू? सगळ्यांनी माझी लोकर घेतली, आता मला कुणी परतच देत नाही.''

बबीला रडूच आलं.

मुलगा म्हणाला, ''रडू नकोस बबे. माझी घोंगडी खूप मोठी आहे. आपल्या दोघांना पुरेल. ये.''

मुलानं बबीला घोंगडीत गुरफटून घेतलं. बबीची थंडी पळाली आणि दोघांची गट्टी झाली.



# मधात पडली आळशी

एका पिंपळाच्या उंचच उंच झाडावर राहात होत्या मधमाश्या. खूप खूप खूप, दोनशे... पाचशे... हजार तरी असतील.





इतक्या सगळ्या मधमाश्या होत्या, तरी पण कधी भांडण नाही की तंटा नाही, रुसणं नाही की फुगणं नाही. कारण सारा दिवस गुं गुं गुं करत काम करायचं आणि रात्र झाली की दमलेले पंख मिटून झोपून जायचं. मग भांडायला वेळ कुठून मिळणार? शिवाय त्यांच्या गुं गुं भाषेत भांडण्यासाठी शब्दच नसतील बहुतेक.

त्या हजार मधमाश्यांमध्ये एकच होती आळशी. कामाचा भारी कंटाळा येई तिला. सारखं काय काम! रविवारीसुद्धा सुट्टी नाही, खेळणं, हुंदडणं, दंगामस्ती काही काही नाही.





"शीऽ ! मला वैताग आलाय कामाचाऽ!" आळशी ओरडे.

पण कुणीही तिच्याकडे लक्ष देत नसे. मग आळशी मुकाट्यानं सगळ्यांबरोबर कामाला जाई. कारण काम केल्याशिवाय फुकटचा मधाचा थेंबही कुणाला मिळत नसे. उपाशी राहावं लागे.

एक दिवस मात्र आळशीला फार म्हणजे अतिशय म्हणजे भयंकर कंटाळा आला. ती म्हणाली, "आज मी नाही उठणार लवकर. कामावर जाणार नाही, मध गोळा करणार नाही, अश्शी पंख मिटून बसून राहीन!"





बाकीच्या सगळ्या मधमाश्या तिच्याशी न बोलता कामावर निघून गेल्या. आळशी एकटीच राहिली.

पण थोड्या वेळानं नुसतं बसण्याचाही तिला कंटाळा आलाच. तिला वाटलं, जरा बागेत फिरून यावं. ती भिरभिरत झाडावरून खाली आली. फुलपाखरांबरोबर खेळली, चतुरांच्या मागे धावली.

धावता धावता ती बागेशेजारच्या एका घरापाशी आली. घराची खिडकी उघडी होती. आळशीनं आत डोकावून पाहिलं. आत छोट्या बाळाची आई बाळाला चमच्यानं काहीतरी चाटवत होती. तिच्याजवळ एक मोठी बरणी होती, आणि त्या बरणीत होता... मध!



आळशीचे डोळे चमकले. पोटात भूक चावायला लागली. एवढा सगळा मध मिळाला तर? वा वा वा!



आळशी सुसाट उडाली आणि तिनं थेट बरणीत सूर मारला. अहाहा! गोड गोड सोनेरी मध! अम् अम् अम्! कितीही खाल्ला तरी पोट भरेना तिचं. मधेच तिला तिच्या काम करणाऱ्या मैत्रिणींची आठवण येऊन हसूच आलं. 'खी खी खी! थेंबभर मधासाठी काम करताहेत! खु खु खु! वेड्या गं बाई वेड्या!' आळशीनं पुन्हा मधात डुबकी मारली.

एवढ्यात बाळाची आई उठली. तिनं बरणीचं झाकण लावून टाकलं, बरणी उचलून फडताळात ठेवली. 'चला आता गाई गाई करायला!' असं म्हणत बाळाला घेऊन ती शेजारच्या खोलीत निघून गेली.





आळशी मधातून वर आली. पाहते तो काय, बरणी बंद! आता? बाहेर कसं जायचं? मधात किती वेळ पोहत बसणार? आणि मध खाणार तरी किती?



आळशी इकडून तिकडे धावली, काचेतून बाहेर पाहू लागली, पंख फडफडावत हाका मारू लागली. पण खोलीत कुणीच नव्हतं तिच्या हाका ऐकायला. आळशीला रडूच यायला लागलं.

एवढ्यात खिडकीतून उडी मारून भुरकी मांजर आत आली. खायला काही मिळतंय का, म्हणून इकडे-तिकडे पाहायला लागली.

आळशीनं पंखांची फडफड केली आणि हाक मारली, "भुरकेऽ, एऽऽ भुरकेऽऽ!"

भुरकी म्हणाली, "कोण हाका मारतंय मला?"

आळशी म्हणाली, "अगं मी, मधमाशी! इकडे वर बघ. मी मधाच्या बरणीत अडकून पडलेय. मला बाहेर काढ ना!

प्लीऽऽज! हा सगळा मध तुला घेऊन टाक. मला मध नको, काही नको."

भुरकी म्हणाली, "मला काय करायचाय मध? मांजरं काय मध खातात? आणि आज बाळानं दूधही उरवलेलं दिसत नाही. आता मला दुसरीकडं शोधायला लागणार. काय त्रास आहे मेला!..." भुरकी तणतणत निघून गेली.



जरा वेळानं भिर्र्रकन चिऊ खोलीत आली. दोन चकरा मारून फडताळावरच येऊन बसली.

"चिऊताई, मी बरणीत अडकून बसले आहे. मला काढ की बाहेर! तुझ्या पिलांना मी गोड मध देईन," आळशी म्हणाली.

चिऊ धापा टाकत म्हणाली, "अगं बाई, तो दुष्ट मंटू मला पकडायला येतोय, म्हणून मी पळतेय. तुला काढायलाबिढायला मला नाही वेळ. आणि माझी पोरं मधाला चोच लावत नाहीत कधी. मला काय करायचाय तुझा मध? आला गं बाई मंटूऽऽ.." असं ओरडत चिऊ भुर्र्रकन पळाली.







दारातून मंटू कुत्रा आत आला. कान ताठ करून इकडे-तिकडे, खाली-वर पाहायला लागला.

"कुठे गेली बुवा ही? या चिमण्यांना पंख असतात हे फार वाईट. सारख्या उडतातच लेकाच्या!" मंटू गुरगुरला.

"मंटूदादा, मला बरणीतून बाहेर काढ ना!" आळशी रडकुंडीला येऊन म्हणाली. "केव्हाची मी अडकून पडले आहे आत!"



मंटू म्हणाला, "मग मी काय करू? आत गेलीसच कशाला म्हणतो मी!"

"अरे, मध खायला! मला वाटलं, एवढा बरणी भरून मध आहे तर खावा पोटभर..."

मंटू म्हणाला, "मग रहा तिथेच आणि खा मध! मला नाही वेळ. कुठं गेली ही चिऊ? सापडूच दे मला, बघतो तिच्याकडे..." असं पुटपुटत मंटू बाहेर धावला.

थोडा वेळ गेला. फडताळात खुडबुड झाली. आळशीनं पाहिलं, उंदराचं एक पिल्लू इकडून तिकडे धावत होतं. तिनं हाक मारली, "एऽऽ... एऽऽ...! इकडे बघ ना जरा!"

पिल्लू नाकावर बोट ठेवून म्हणालं, "शूऽऽ! केवढ्यांदा ओरडतेयस! लिंबूला माझी लपण्याची जागा कळेल ना!"

आळशी हळू आवाजात म्हणाली, "सॉरी हं! पण हा लिंबू कोण? आणि तू का लपलाहेस इथे?"

"लिंबू माझा जुळा भाऊ आहे. माझं नाव टिंबू. आम्ही

लपाछपी खेळताहोत आणि लिंबूवर राज्य आहे.''

आळशी म्हणाली, ''ए टिंबू, मला या बरणीमधून बाहेर यायला मदत करतोस? किती वेळ झाला रे मी अशी बसून राहिले आहे त्याला!''



टिंबू म्हणाला, ''थांब गं! तुझं बोलणं ऐकून तो लिंबू येईल इकडे... तो बघ आलाच! मी पळतोऽ...'' टिंबू धूम पळाला.

आता मात्र आळशीला रडू आलं. ''गुंऽऽ गुंऽऽ! मला कुणीसुद्धा मदत करत नाहीऽ! कुणालाच माझ्याकडे बघायला वेळ नाहीऽ...! मी इथेच मधात पडून मरून जाणारऽ! गुंऽऽ गुंऽऽ!''

इतक्यात छोटा पंकज खोलीत आला. त्यानं एक स्टूल



फरफर ओढत फडताळापाशी आणलं आणि वर चढून तो एकेक डबा उघडायला लागला.

"पापड... पीठ... डाळ... शी बाबा! रव्याचे लाडू कुठे लपवून ठेवलेत आईनं कोण जाणे!" पंकज वैतागून म्हणाला

एवढ्यात त्याला अगदी बारीक आवाज ऐकू आला. "गुंऽऽ गुंऽऽ, मला घरी जायचंऽऽ!"

पंकजचं लक्ष मधाच्या बरणीकडे गेलं. तो म्हणाला, "अरेच्या! मधमाशी? ही बरणीत बसून काय करते आहे? काय गं, तू आत काय करतेयस? आणि रडतेस का अशी?"

आळशी म्हणाली, "मी पुन्हा कधी बरणीत शिरणार नाही आणि आयता मध खाणार नाही आणि आळशीपणा करणार नाही, पण मला बाहेर काढ ना!"

पंकज म्हणाला, "नको! तू मला चावशील!"

आळशी म्हणाली, "मुळीच नाही! तू



मला प्रेमानं बाहेर काढलंस तर चावायला मी काय वेडी मधमाशी आहे? उलट घरी परत जाऊन मी फुलांमधला बरणीभर मध गोळा करीन आणि तुला देईन. मला काढ ना बाहेर!"

पंकज म्हणाला, "बरं, थांब हं! रडू नकोस."

त्यानं फडताळावरची बरणी खाली काढली, तिचं झाकण उघडलं. एक चमचा आत घातला. आळशी पटकन त्या चमच्यात



चढून बसली. मग पंकजनं तिला बाहेर काढलं. आळशीनं पंख झटकले आणि भिरभिरत हवेतच उड्या मारत म्हणाली, "पंकज, तू एकदम शहाणा आणि मधाएवढा गोड मुलगा आहेस. आता मी तुझ्यासाठी मध गोळा करायला जाते. टाऽटाऽऽ!"

पंकज म्हणाला, "टाऽटाऽऽ!"

आणि आळशी भिरभिर उडत आपल्या पोळ्याकडे परत गेली. पण तेव्हापासून तिनं आळस मात्र कधी केला नाही.



# मासोळी आणि चिमुकलं पाखरू

एका सुंदर तळ्यात एक छोटीशी मासोळी आपल्या आई-बाबाबरोबर राहात होती. तिला खूप मासोळ्या मैत्रिणी होत्या आणि खूप मासे मित्र होते. त्यांच्याबरोबर ती पाण्यात दिवसभर हुंदडायची, सुळकन् इकडे आणि सुळकन् तिकडे धावायची, शेवाळ्यावरून घसरगुंडी खेळायची.

तळ्याच्या काठी छोटे छोटे खडक होते. अर्धे पाण्यात आणि अर्धे पाण्याच्या वर. मासोळी आपल्या मित्र-मैत्रिणींबरोबर त्या खडकांच्या भोवती शिवाशिवी खेळायची, लपाछपी खेळायची.



एक चिमुकलं पाखरू रोज त्या खडकावर येऊन बसे. भल्या सकाळी सूर्याची पहिली किरणं पाण्यावर पडली की ते पाण्याच्या जवळ येई. आपल्या इवल्या इवल्या पंखांची फडफड करून अंगावर पाणी उडवून घेई. मग आपल्या छोट्याश्या चोचीनं आपली रंगीबेरंगी पिसं स्वच्छ करी.

एवढं झालं की पाखरू खडकावरच्या एखाद्या कोरड्या खळग्यात उन्हाकडे पाठ करून गुरगटून बसे आणि सकाळच्या उबदार उन्हात पाठीला शेक घेई.

पाण्यात खेळता खेळता मासोळीचं त्या पाखराकडे लक्ष जाई. तिला भारी गंमत वाटे.



एक दिवस तिला वाटलं की पाखराला आपल्याबरोबर खेळायला बोलवावं. ती खडकाजवळ गेली आणि त्याला म्हणाली, ''माझ्याशी खेळायला येतोस?''

पाखरानं इकडे-तिकडे पाहिलं. कोण बोललं? कुणाचा हा आवाज?

''मी! मी, मासोळी! इकडे पाण्यात बघ,'' मासोळी म्हणाली.

पाखरानं मान तिरपी करून पाहिलं. ''तू होय!'' ते म्हणालं. ''किती सुंदर आहेस तू!''

मासोळी म्हणाली, ''तूसुद्धा छान आहेस. तुझ्या अंगावर किती छान रंग आहेत! माझ्याशी खेळायला येतोस?''

''कुठे, पाण्यात?'' पाखरू म्हणालं. ''नको गं बाई!''



''का रे?''

''माझ्या नाकात आणि तोंडात पाणी जाईल. मला तुझ्यासारखं पोहता येत नाही काही!'' पाखरू म्हणालं.



"का नाही येत तुला पोहता? तुझ्या आई-बाबानं शिकवलं नाही तुला पोहायला?" मासोळीनं विचारलं.

"अगं, मी काय तुझ्यासारखा मासा आहे का पाण्यात पोहायला?" पाखरू म्हणालं.



मासोळीला खूप आश्चर्य वाटलं. तिला वाटायचं की सगळीकडे तिच्यासारखे मासेच राहातात.

"तू मासा नाहीस? मग कोण आहेस?" तिनं विचारलं.

"मी पाखरू आहे. तिकडे झाडावर राहातो."

मासोळीनं कधी झाड पाहिलंच नव्हतं.

"झाड? झाड म्हणजे काय?" तिनं विचारलं.



"ते उंच असतं. त्याला फांद्या असतात आणि खूप खूप पानं असतात, हिरवी हिरवी," पाखरानं सांगितलं.

"हो? आणखी काय काय असतं तिकडे?"

"आणखी फुलं असतात, फुलपाखरं असतात, मऊ गवत असतं, झालंच तर अळ्या असतात छान छान..."



मासोळीला हे सगळं नवीनच होतं. कशी असतील फुलं आणि फुलपाखरं? आणि गवत?

"ए, मला घेऊन जाशील तिकडे?" तिनं पाखराला विचारलं.

"हो, नेईन की! पण तुला उडता येतं का?"



"म्हणजे कसं?"

"हे असं..."

असं म्हणून पाखरानं खडकावरून झेप घेतली. थोडं उंच जाऊन दोन-तीन घिरट्या मारल्या आणि पुन्हा ते अलगद खडकावर येऊन बसलं.

मासोळी पाहातच राहिली. "अहाऽऽऽ, किती छान! मलाही उडायचंय, तुझ्यासारखं," ती पाखराला म्हणाली.

"तुला माझ्यासारखे पंख आहेत का पण?" त्यानं विचारलं.

मासोळीनं स्वतःकडे पाहिलं तर तिलाही छोटे छोटे पंख होते आणि पाखरासारखी शेपूटही होती. मासोळीला खूप आनंद झाला.



“हे बघ माझे पंख आणि शेपूट,” ती म्हणाली. “आता येऊ मी तुझ्याबरोबर?”

पाखरू म्हणालं, “आधी तुझ्या आई-बाबाकडून तू उडायला शिकून घे, मग मी नक्की नेईन तुला.”

“चालेल,” मासोळी म्हणाली. “उद्या भेट हं मला इथेच ! टाऽटा!”

“टाऽटा!” पाखरू म्हणालं.



मासोळी सुर्र सुर्र पोहत आईकडे गेली. तिला म्हणाली,

“आई गं, मला उडायला शिकव, मला त्या पाखराबरोबर झाडावर जायचंय आणि तिकडची गंमत बघायचीय.”

आई म्हणाली, ''नाही गं बाळा. आपण मासे आहोत. आपल्याला उडता कसं येईल? आपण पाण्यातच राहायचं असतं.''

मग मासोळी बाबाकडे गेली. ''बाबा, मला उडायला शिकव. मला त्या पाखराबरोबर उंच जायचंय, फुलं आणि फुलपाखरं बघायची आहेत.''



बाबानंही आईसारखंच सांगितलं. मासोळीला राग आला. ''मी एकटी एकटी शिकेन. तुमची मदत नकोच आम्हाला,'' असं म्हणून तिनं आई-बाबाशी कट्टी केली.

दुसऱ्या दिवशी सकाळी सूर्य उगवण्याआधीच मासोळी खडकापाशी गेली आणि पाखराची वाट पाहायला लागली.



सूर्य उगवला आणि नेहमीप्रमाणे छोटं पाखरू खडकावर येऊन बसलं. मासोळी त्याला म्हणाली, ''मला तूच शिकव उडायला. आई नाही म्हणाली आणि बाबाही नाही म्हणाला.''

पाखरू म्हणालं, ''मग आधी पाण्याबाहेर ये ना. पाण्यात कशी उडणार तू?''

मासोळी म्हणाली, ''खरंच की! आलेच बघ मी.''

मासोळीनं जोरात उसळी मारली आणि ती टपकन् पाण्याबाहेरच्या वाळूवर येऊन पडली.



तिला वरचं निळं निळं आकाश दिसलं, तळ्याकाठची हिरवी हिरवी झाडंही दिसली. आता आपल्याला उंच उंच उडता येणार म्हणून मासोळीला खूप आनंद झाला.

पण त्याच वेळी मासोळीला उन्हाचे चटके बसायला लागले. तिला श्वास घेता येईना. जीव घाबरा झाला आणि मासोळी ओरडली, "आई गं, वाचवा, वाचवा...!"



चिमुकलं पाखरूही घाबरलं आणि चिव चिव करायला लागलं. दोघांचा आरडाओरडा ऐकून जवळ गवतात खेळत असलेली बेडकुली टुणटुण उड्या मारत आली. तिनं जोर लावून मासोळीला पाण्यात ढकललं आणि मासोळी डुबुक्कन् पाण्यात पडली. पण ती अजूनही खूप घाबरलेली होती. "आई गंऽऽऽ!" तिनं हाका मारल्या.



मासोळीची आई सुर्र सुर्र पोहत आली आणि तिनं मासोळीला जवळ घेतलं.

"कशाला गेलीस पाण्याबाहेर?" आईनं विचारलं.

''मला वाटलं, त्या पाखरासारखं उडता येईल आणि तिकडची गंमत बघता येईल,'' मासोळी रडवेली होऊन म्हणाली.

''अगं, त्या पाखराला तरी पाण्यात पोहता येतं का तुझ्यासारखं? आपल्या पाण्यात किती छान गमती आहेत, त्या कुठे त्याला पाहता येतात? सगळ्यांना सगळंच काही मिळत नाही, हो की नाही?''

''हो आई. मी पुन्हा असा वेडेपणा नाही करणार,'' मासोळी म्हणाली.

तेव्हापासून मासोळी आणि चिमुकलं पाखरू रोज सकाळी तळ्याकाठी भेटतात. मासोळी पाण्यातल्या गमती पाखराला सांगते आणि पाखरू जमिनीवरच्या गमती मासोळीला सांगतं.





अगदी छोट्या मुलांनी
पाहत पाहत ऐकाव्यात
आणि वाचता येणाऱ्यांनी
वाचत वाचत पाहाव्यात
अशा तीन बाळगोष्टी.



ज्योत्स्ना प्रकाशन

'धवलगिरी' ४३०-३१ शनिवार पेठ, पुणे ४११०३०, फोन : (०२०) २४४५१४५३,
मोहन बिल्डिंग, १६२ ज. शंकरशेठ मार्ग, गिरगाव, मुंबई ४००००४ फोन : (०२२) २३८७७०१९
jyotsnaprakashan@vsnl.com ISBN 81-7925-122-5